**मोटार वाहन विभागातील नवनियुक्त सहायक मोटार वाहन निरीक्षक यांच्या महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या कार्यशाळेतील प्रशिक्षणासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शिकाना १२१९/प्र.क्र.१४/परि-४,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २३ डिसेंबर, २०२१

**वाचा:** १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि. २३/९/२०२१.

२. शासन निर्णय, गृह विभाग समक्रमांक, दि. २२/९/२०२०.

३. अपर परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पआका/का-१३/प्रशिक्षण-२१/ २०१८/ जा.क्र.१४८८६, दि.१०.१२.२०२१.

**प्रस्तावना :-**

उपर्निर्दिष्ट ३ येथील पत्रान्वये परिवहन आयुक्त कार्यालयाने विनंती केल्यानुसार, मोटार वाहन विभागातील नवनियुक्त ७८७ सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक यांना महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या कार्यशाळेतील प्रशिक्षणासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मोटार वाहन विभागातील नवनियुक्त ६७७ सहायक मोटार वाहन निरीक्षक यांना महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या कार्यशाळेत देण्यात आलेल्या प्रशिक्षणासाठी रु. ४२.४८/- x ३६५ दिवस x ६७७ प्रशिक्षणार्थी याप्रमाणे रु.१,०४,९७,०२०/- (रुपये एक कोटी चार लाख सत्याण्णव हजार वीस मात्र) इतक्या खर्चास तसेच, नवनियुक्त ११० पैकी १०४ सहायक मोटार वाहन निरीक्षक यांचे महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या कार्यशाळेतील प्रशिक्षण दि. २५.०६.२०२१ रोजीपासून एक वर्षाचे (५२ आठवडयांचे) तर उर्वरित ०६ सहायक मोटार वाहन निरीक्षकाचे दि. १५.०९.२०२१ रोजीपासून एक वर्षाचे (५२ आठवडयांचे) कार्यशाळेतील प्रशिक्षणासाठी रु. ४२.४८/- x ३६५ दिवस x ११० प्रशिक्षणार्थी याप्रमाणे रु. १७,०५,५७२/- (रुपये सतरा लाख पाच हजार पाचशे बहात्तर मात्र), असे एकूण ७८७ सहायक मोटार वाहन निरीक्षक प्रशिक्षणार्थ्यांच्या विषयांकीत प्रशिक्षणासाठी येणाऱ्या एकूण रु.१,२२,०२,५९२/- (रुपये एक कोटी बावीस लाख दोन हजार पाचशे ब्याण्णव मात्र ) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च " मागणी क्र. बी-३, २०४१ वाहनावरील कर, (०१)(०२) मोटार वाहन विभागातील अधिकारी व कर्मचारी यांना प्रशिक्षण (योजनांतर्गत) (२०४१ ०३४१)-१३ कार्यालयीन खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला उप विभाग-तीन मधील अनुक्रमांक ४ व महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका मधील परिच्छेद २७(२) अ) नुसार एखाद्या योजनेला / प्रकल्पाला प्रशासकीय (वित्तीय मंजूरी धरुन) मान्यता देण्याबाबत आवर्ती खर्चाच्या बाबतीत वार्षिक रुपये पन्नास लक्ष व अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रुपये पाच कोटी योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत. या अधिकारान्वये सदरहू शासन निर्णय निर्गमित करण्यात आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२३१५२१२३९६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI
BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2021.12.23 15:22:25 +05'30'

**( भरत रा. लांघी )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव

२) मा.मंत्री/राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव

३) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.

४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

५) परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/प्रशासन/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.

६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

८) उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) उप/सह सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) कक्ष अधिकारी/अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवडनस्ती- (परि-४).